**मिरा-भाईंदर-वसई-विरार पोलीस आयुक्तालयाच्या आस्थापनेवर ५०० मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्रणेकडून (महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळाकडून) घेण्यास मंजुरी देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस-०४२१/प्र.क्र.११३/विशा-४**
मंत्रालय मुख्य इमारत, दुसरा मजलामादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई
तारीख: ०६ जून, २०२४

वाचा :-

१) गृह विभाग शा. नि. क्र. एमआयएस-०४२१/प्र.क्र.११३/विशा-४, दि. ०७, डिसेंबर, २०२३
२) सहायक पोलीस महानिरीक्षक (नि.व स.) पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांचे दि.०१.०३.२०२४ चे पत्र
३) उपसमितीच्या दि. १४ मे, २०२४ मधील तिसऱ्या बैठकीचे इतिवृत्त वित्त विभाग पत्र क्र. पदनि-२०२४/प्र.क्र. १८/आपुक, दि. २७.०५.२०२४

प्रस्तावना

पोलीस अधीक्षक, ठाणे ग्रामीण व पालघर घटकाचे विभाजन करून मिरा-भाईंदर वसई-विरार पोलीस आयुक्तालय हे दि. ०१.१०.२०२० पासून कार्यान्वित करण्यात आले आहे. मिरा-भाईदर वसई-विरार पोलीस आयुक्तालयांतर्गत पोलीस शिपाई पदे विहित मार्गाने भरण्याची कार्यवाही पूर्ण होईपर्यंत किमान ११ महिने कालावधीसाठी एकुण ५०० मनुष्यबळ महाराष्ट्र राज्य सुरक्षा मंडळाकडून घेण्याची विनंती पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी केली होती. सदर विनंतीस अनुसरून मिरा-भाईंदर वसई-विरार पोलीस आयुक्तालया अंतर्गत पोलीस शिपाई पदे विहीत मार्गाने भरण्याची कार्यवाही पूर्ण होईपर्यत किमान ११ महिन्यांच्या कालावधीकरीता एकूण ५०० मनुष्यबळाच्या सेवा महाराष्ट्र राज्य सुरक्षा मंडळाकडून घेण्याकरीता मुदतवाढ देण्यास वित्त विभागाने गठीत केलेल्या उपसमितीच्या शिफारसीस अनुसरून मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. पोलीस अधीक्षक, ठाणे ग्रामीण व पालघर घटकाचे विभाजन करून नव्याने निर्माण केलेल्या मिरा-भाईंदर वसई-विरार पोलीस आयुक्तालया अंतर्गत पोलीस शिपाई पदे विहीत मार्गाने भरण्याची कार्यवाही पूर्ण होईपर्यत एकूण ५०० मनुष्यबळाच्या सेवा महाराष्ट्र राज्य सुरक्षा मंडळाकडून घेण्याकरीता दिनांक ०१.०४.२०२४ ते २८.०२.२०२५ या कालावधीपर्यत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर मान्यता वित्त विभागाने गठित केलेल्या उपसमितीच्या दि. २७.०५.२०२४ रोजीच्या शिफारसीस अनुसरून देण्यात येत आहे.

३. या बाबीकरीता येणारा खर्च हा लेखाशिर्ष बी-१, २०५५-पोलीस या मुख्य लेखाशिर्षातर्गत १०९ (००) (०१) २०५५ ०१६८ जिल्हा पोलीस बल या उपलेखाशिर्षाखाली १०- कंत्राटी सेवा या लेखाशिर्षातून चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून खर्च करण्यात यावा. याकरिता पोलीस आयुक्त, मिरा-भाईंदर वसई-विरार यांना नियंत्रण अधिकारी तसेच त्यांच्या अधिनस्त वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६०६११५१४७७४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2024.06.06 12:04:44 +05'30'

**( चेतन निकम )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई
३) पोलीस आयुक्त, मिरा-भाईंदर-वसई-विरार आयुक्तालय
४) पोलीस महासंचालक तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ,मुंबई
५) सर्व पोलीस आयुक्त
६) सर्व पोलीस अधीक्षक
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
९) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
१०) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई
११) वित्त विभाग कार्यासन(व्यय-७),वित्तियसुधारणा ,(आपुक) मंत्रालय,मुंबई
१२) गृह विभाग, कार्यासन,पोल-५,पोल-३,अर्थ-१ मंत्रालय,मुंबई
१३) निवडनस्ती विशा/४